**मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांतर्गत कार्यरत असलेले श्री.विवेक काशिनाथ खटाण, अनुरेखक यांच्यासाठी अधिसंख्य पद निर्माण करुन मुदतवाढ देणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२३/प्र.क्र.४४/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०८ मे, २०२३.

संदर्भ : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७अे/१६-ब, दि.३० जून, २०२०
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१९/ प्र.क्र.५८१ ए/ १६-ब दि.१४ ऑक्टोबर, २०२२.
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे क्र.मुअ(मुं)/आस्था-२/ प्र.क्र.४८/१५०७/२०२३, दि.२९ मार्च, २०२३.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१ डिसेंबर, २०१९ अन्वये अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेले, अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यानंतर विशेष मागास प्रवर्गाचे अथवा अन्य कोणत्याही मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले अधिकारी / कर्मचारी, अनुसूचित जमातीचा दावा सोडून दिलेले अधिकारी / कर्मचारी तसेच ज्या अधिकारी व कर्मचा-यांनी त्यांचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या जात पडताळणी समितीच्या निर्णयाच्या विरोधात मा.न्यायालयात याचिका दाखल केल्या असतील, मात्र त्यांच्या प्रकरणी मा.उच्च न्यायालयाने किंवा मा.सर्वोच्च न्यायालयाने जात प्रमाणपत्र अवैध ठरविण्याच्या समितीच्या निर्णयास स्थगिती दिली नसेल अशा अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करून त्यांच्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.३० जून, २०२० अन्वये सदर अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे प्राधिकार प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत. त्यानुसार मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई अंतर्गत कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई सार्वजनिक बांधकाम विभाग, अंधेरी, मुंबई यांच्या अधिनस्त कार्यरत असलेले श्री.विवेक काशिनाथ खटाण, अनुरेखक यांचे “ महादेव कोळी ” या अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र, जात पडताळणी समिती, कोकण भवन, ठाणे यांनी अवैध ठरविल्यामुळे त्यांच्यासाठी अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१ डिसेंबर, २०१९ व दि.३० जून, २०२० मधील तरतुदींनुसार श्री.विवेक काशिनाथ खटाण, अनुरेखक यांच्यासाठी अधिसंख्य पद निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कर्मचा-याचे नाव व कार्यालय | पदनाम | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात आल्याचा दिनांक | अधिसंख्य पदावर देण्यात येणारे मासिक वेतन |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | श्री.विवेक काशिनाथ खटाण, (कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई सार्वजनिक बांधकाम विभाग, अंधेरी, मुंबई यांचे कार्यालय) | अनुरेखक | २६/०६/१९९७ | ३१/०३/२०२६ | १८/०१/२०२३ | रु.६८,०१०/- |

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४ ऑक्टोबर, २०२२ नुसार श्री.विवेक खटाण, अनुरेखक यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आल्याच्या दिनांकापासून म्हणजेच दि.१८ जानेवारी, २०२३ पासून दि.१७ डिसेंबर, २०२३ पर्यंत ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असतील तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त होणार असतील त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१ डिसेंबर, २०१९, दि.३० जून, २०२० व दि.१४ ऑक्टोबर, २०२२ अन्वये दिलेल्या सूचनेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. अधिसंख्य पदाच्या वेतनावर होणारा खर्च हा संबंधित कर्मचारी सध्या ज्या कार्यालयात कार्यरत आहे, त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधिच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०५०८१६०४४३३९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO

Digitally signed by SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=1fbca76d11ad25e383a0e28da215f01e12183c1b565ddd29aaf1ffbfad8e9e9c, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6F385E4139AB144CAAF92B440B55068479C3789EA50EC85EB7A16B7C932CB397, cn=SHINDE VIKRAMSINGH PRAKASHRAO
Date: 2023.05.08 16:12:50 +05'30'

**( विक्रमसिंह प्र. शिंदे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
३) कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई सार्वजनिक बांधकाम विभाग, अंधेरी (पश्चिम), मुंबई.

**प्रत**-१) मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) अपर मुख्य सचिव (सा.बां.) /सचिव (रस्ते) /सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५) महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
७) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे कुर्ला संकुल, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
८) कार्यासन सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग.
९) कार्यासन प्रशासन-१ (निवडनस्ती).